ॐ श्रीगणेशाय नम: । आदिशक्ति कथा पुढती सांगत । मयूरेश जाऊन त्या क्षेत्रांत । सिंधूची मूर्ति स्थापिली पहात । क्रोधभरें ती चूर्ण करी ।।१।। आतां ती वार्ता दूत । सांगतील सिंधूप्रत । या विचारें भयभीत । मुनिजन शंकरादि सारे ।।२।। तेथही मायारूप घेऊन । दैत्येंद्र आले दबा धरून । शिवसुता मारण्या उत्सुकमन । त्यांस मारी मयूरेश नित्य ।।३।। तदनंतर विघ्नविनाशास्तव । इंद्रयज्ञ आरंभी शिव । मयूरेश मोडी तो यज्ञ क्रोधभाव । व्यक्त करून यज्ञस्थळीं ।।४।। तेव्हां इंद्र देवांसहित । मयूरेशासवें लढत । त्यास जिंकून गणराज स्वपुरांत । विजयाच्या आनंदात ।।५।। अन्य शक्ति विचारिती । तेव्हां आदिशक्तीप्रती । सिंधूच्या कारागारीं जे असती । ते देव तेथ कैसे आले ।।६।। मयूरेशाविरूद्ध लढले । हें कैसें शक्य झालें । तें सांगून पाहिजे केलें । संशय पटल तूं दूर ।।७।। आदिशक्ति तैं सांगत । मेरुसंस्थ महेशान असत । दैत्य त्यांसी बद्ध करित । परी ते समर्थ न होती ।।८।। देव त्रिविध असती ख्यात । तत्त्वाकार शक्तींनो ते ज्ञात । कर्ममय ते देहरूप असत । शास्त्र ऐसें सांगतसे ।।९।। सर्व भावांत चमकत । म्हणून देव ऐसे ख्यात । देवत्व त्यात त्रिविध वर्तत । वेदवादी हें जाणती

।।१०।। शंभर अश्वमेध यज्ञ करित । तो इंद्रपद भोगित । कर्मज देव ऐसे राहत । कांचनाचलीं मेरूपर्वतीं ।।११।। मंदारादि स्थानांत । त्यांचीं नगरें वर्तत । त्यांस असुरादि जिंकित । यांत कांहीं संशय नसे ।।१२।। ब्रह्मदेवाच्या दिवसांतीं ते जात । मन्वंतरपरायण लयांत । यज्ञाचें फळ पूर्ण भोगित । तेव्हां पुनः जन्म घेती ।।१३।। पुनरपि मनुष्य जातींत येती । जैसें कर्म तेथ करिती । तैसें फळ ते लाभती । ऐसें रहस्य जाणावें ।।१४।। अन्य कर्ममय देव स्थित । व्यापून सर्व विश्व राहत । आपल्या अधिकारानुरूप वर्तत । कर्मपरायण ते सारे ।।१५।। जठराग्नि तैसा बाह्याग्नि । अधिकार त्या देवांचे असोनी । यमयातनादीपासुनी । अन्य अद्भुताधिकारी ते ।।१६।। दैत्यांचा त्यावरी प्रभाव न पडत । कर्मबळें कदापि विश्वांत । सदा अधिकारसंयुक्त । ते देव दुसऱ्या प्रकारचे ।।१७।। योगबळें योगीश । तो देवांसी चालवितो परेश । अन्य कोणत्या बळें अनीश । चलन न पावती अधिकारयुत ।।१८।। ब्रह्मदेवाच्या दिवसांतीं न पावत । मृत्यु हे देव श्रेष्ठ । कर्मरूप प्रधारक असत । निराधार हे सारे ।।१९।। जेव्हां महाप्रलय होत । तेव्हां हेही लय पावत । यांत संशय कांहीं नसत । ऐका शक्तींनो रहस्य हें ।।२०।। लोकपरिवारासहित । ते पुनः देहधारी होत । मृत्युलोकीं नर समस्त । कर्मनियंत्रित असतातीं ।।२१।। जैसें कर्म करिती । तैसें ते फळ लाभती । तत्त्वरूप देव असती । वेदांमध्यें प्रकीर्तित ।।२२।। ते तत्त्वानें चराचर विश्व । आनंदविती अभिनव । उत्पत्ति स्थिति संहार भाव । ब्रह्माकारस्वभावें राहती ।।२३।। हे जगदीश्वर समस्त । महाप्रलय जेव्हां होत । तेव्हां स्वविहार संपवित । योगनिद्रा तैं घेती ।।२४।। योगाकार ते विशेषें असत । पुनः निर्मून ब्रह्मांड खेळत । देवनायक त्यास नसत । योगबळानें ही भीती ।।२५।। योग हा द्विविध वर्णित । विबुधोत्तमांनी

शास्त्रांत । वायुसाधनादींनी लाभत । प्राणायामादिकांनी ।।२६।। त्या योगानें तत्त्वस्थ होत । देवही योग्यांच्या वंशजांत । केव्हां तें करावें रहस्य ज्ञात । शास्त्रमार्गानुसार ।।२७।। संप्रज्ञात असंप्रज्ञात । योग द्विविध असे ख्यात । दुसरा ब्रह्मभूत विदित । योग्यांसी तो साध्य महा ।।२८।। त्या योगबळें योगी जिंकती । सुरांसी नर साध्य करिती । देव त्यायोगें त्यांच्या वश होती । करिती जें जें ते इच्छित ।।२९।। प्रारब्ध चाळविती योगीवश होऊन । देव ते होत पराधीन । तेव्हां त्या देवांच्या विहारीं योगिजन । आसक्त होती तैं योगभ्रष्ट ते ।।३०।। ते जन्ममृत्यु वश होती। योग्यांच्या योगभावें देवांस भीती । तत्त्वरूप ते जाणावे जगती । वेदवाद ह्यास प्रमाण ।।३१।। कर्म एक त्रिविधस्थांचें । एकेक आश्रित रूपांचें। त्याच्या सेवनें भजनें त्यांचें । द्वंद्वरूप वर्ततसे ।।३२।। आतां प्रकृत अवतार चरित । विकटाचें ऐका एकचित्त । एकदा ब्रह्मदेव मयूरक्षेत्रांत। आला तें क्षेत्र पहावया ।।३३।। तेव्हां तो मोहयुक्त । विचार आपुल्या करी मनांत । हा शिवाचा पुत्र ज्ञात । यास नमन मीं न करावें ।।३४।। मीं ज्येष्ठ हा गणेश्वर साक्षात । जरी यांत संशय नसत । तरी परीक्षा घेऊन पश्चात । नमन मीं करीन यासी ।।३५।। ऐसा विचार करून ब्रह्मांडांत । शिवशक्तिसमन्वित । अन्तर्धान पावून राहत । गुप्तरूपें ब्रह्मदेव ।।३६।। मयूरेश तें जाणून । निर्मी चराचर जग प्रसन्न । ब्रह्मदेव तें पाहून । शरण गेला पुनः त्यासी ।।३७।। तेव्हां श्वासासह । ब्रह्मास ओढी उदरांत । तेथ अनंत ब्रह्मांडें भटकत । ब्रह्मदेव येथून तेथे ।।३८।। ऐसी सहस्त्र वर्षे जात । तेव्हां उच्छ्वासमार्गें टाकित । बाहेर त्या विधीस बळवंत । मयूरेश महायश ।।३९।। बाहेर येऊन विधाता पाहत । एक क्षण त्यास तैं विस्मित । होऊन पुनरपि शरण जात । स्तुती करी तयाची ।।४०।।

तदनंतर हर्षयुक्त होऊन । परतला स्वस्थानीं विनतमन । मयूरक्षेत्रीं तेव्हांपासून । ब्रह्मकमंडलू वर्ततसे ।।४१।। ऐशा प्रकारें विधीचा मद । हरण करून खेळे सुखद । द्विजपुत्रांसवें हर्षद । मयूरेश जो जगत्स्त्रष्टा ।।४२।। भक्तांसी जो सर्व देत । ऐसा हा देव उदात्त । पुढें एकदा भाद्री चतुर्थी येत । शुक्ल पक्षांतली तेव्हां ।।४३।। तेव्हां गणेश्वराची मृण्मय मूर्ति । आपापल्या घरीं स्थापिती । शंकरादि गण सर्व पूजिती । आदरानें त्या मूर्तीसी ।।४४।। मयूरेश स्वत: बनवित । शुंडादंडादि चिन्हयुक्त । मूर्ति एक तिज पूजित । स्तुती करी जोडून कर ।।४५।। मयूरेश त्या स्वरूपांत । स्वत:चीच स्तुति करीत । गणनाथा वंदन तुजप्रत। सर्वविघ्नविदारक नमन तुला ।।४६।। भक्तांना जे दुष्टरूप असत । त्यांना जो विघ्न देत । ब्रह्मांचा पति जो उदात्त । सर्व सिद्धिप्रदाता ।।४७।। अमेय मायेनें युक्त । ऐशा ढुंढे नमन तुजप्रत। वक्रतुंडा मीं प्रणाम करित । वक्रांचा तूं नाशकर ।।४८।। परात्म्यासी लंबोदरासी। सर्वांच्या जठरस्थासी । चिंतामणिस्वरूपासी । पंचचित्तधरा नमन असो ।।४९।। हेरंबासी परेशासी । दीनांसी दीनरूपासी । योगेशासी सदा शांतिदात्यासी । शांतिमयासी नमन असो ।।५०।। शांतीच्या शांतिरूपासी । गणेशासी ज्येष्ठराजासी । पूज्यासी विकटासी। ज्येष्ठांस पददात्या नमन तुला ।।५१।। सर्वांच्या मातापित्यासी । अनादीसी विघ्नपासी । सर्वांच्या आदिस्वरूपासी । विघ्नांच्या विघ्नरूपा नमन तुला ।।५२।। सर्वसत्तात्मकासी । स्वानंदवासीसी सर्वपूज्यासी । संयोग अयोग मूर्तीसी । भक्तांस भक्तिदात्या नमन तुला ।।५३।। महोदरासी भीमासी । पाप्यांसी दंडदात्यासी । स्वधर्मनिरतां सुखदात्यासी। मयूरवाहना नमन तुला ।।५४।। मयूरेश्वरासी आखुवाहासी। सर्वेशासी परात्परासी । काय स्तवूं मीं तुजसी । गणाधीशा

योगाकारस्वरूपा ।।५५।। शिवादीही असमर्थ झाले । स्तुति करूं न शकले । वेदादिकही मूकत्व पावले । तेथे माझी काय कथा ।।५६।। आम्हीं तुझे सदा दास। करी आमुच्या रक्षणास । देई दृढ भक्ति तुझी आम्हांस । जेणें माया न बाधेल ।।५७।। बुद्धीशा तुज माझें नमन । ऐसें मयूरेशासी स्तवून। मयूरेश झाला नत एकमन । पूजाविधि आचरे भक्तीनें ।।५८।। ऐशा रीतीं शिवादि पूजिती । सर्वही ते गणनायकाप्रती । मुनिगणही सर्व स्थापिती । मृण्मयमूर्ति विशेषें ।।५९।। त्या कालावधींत तेथ येत । विश्वदेव तीर्थें हिंडत । यदृच्छेनें तेथ प्राप्त। एकनिष्ठ पूजितसे नारायणा ।।६०।। तो नित्य पूजी नारायणासी । शेषशायी जो सुखविलासी । अव्याहतगति तो पापासी । जाळून टाकी तपानें ।।६१।। समुद्रमध्यांत वसत । त्या जनार्दना तो भजत । नंतर जलादिक समस्त । सेवन करी भक्तीनें ।।६२।। अत्यन्त भक्तियोगें पावत । गाणेशांत योग्यता वरिष्ठ । माया करून झाकून टाकित । ज्ञान विश्वदेवाचें ।।६३।। मायेनें मयूरेश जाणत । शेषशायीचा वृत्तान्त । बुद्धिमोहानें तो विसरत। योगमायेनें रहस्य सारें ।।६४।। विश्वदेव येऊन पार्वतीप्रत । भिक्षा पायसादींची मागत । तीही तें त्यास देत । आपोशन करून स्मरण करीं ।।६५।। शेषशायीचें स्मरण करित । तो महादु:खयुक्त । तेथेचि जाहला स्थित । तो द्विजोत्तम त्यासमयीं ।।६६।। तदनंतर गणराज खेदयुक्त । नारायण होऊन सांत्वन करित । चार वर्षांचा तो बाळ पूजित । पराशरसुत मूर्तीसी ।।६७।। मृण्मय उपचारांनी पूजित । त्या मूर्तीसी भक्तियुक्त। गणेशाख्य ज्ञान त्याप्रत । विश्वदेव देत असे ।।६८।। त्या शांतिप्रद ज्ञानें युक्त । गाणपत्य स्वभावें नमित। गुणेश्वरासी तैं शांति प्राप्त । विश्वदेव गेला स्वस्थानीं ।।६९।। एकनिष्ठेनें मुनि भजत मयूरेशासी । ऐशा सुव्रतें विस्मृत । भावें कैसे

ज्ञान संछादलें ।।७०।। विष्णूचा पराक्रम हटवून । खेळे तेथ मयूरेश प्रसन्न । द्विजबाळांसह क्रीडा पावन । करित होता गजानन ।।७१।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते विष्णवादिपराधीनतादर्शनं नाम चत्वारिंशत्तमोऽध्याय: समाप्त:। श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय चाळिसांवा संपूर्ण)